१३ व्या वित्त आयोगाकडून अर्भक मृत्यूदर कमी करण्यासाठी मंजुर अनुदानाच्या विनियोगासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत. (Transport of New Born Babies: Providing Radiant Warmer/ CPAP in existing 108 Ambulance at 10 High IMR Blocks)

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-२०१७/प्र.क्र.४६६/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ०७ डिसेंबर, २०१९.

वाचा :-

१) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण, पुणे यांचे पत्र क्र. राकुकका/बालआरोग्य कक्ष १५क/१३ वा वित्त आयोग/ पुनःश्च प्रशासकीय मान्यता/ २४६३५-३७/२०१९, दिनांक १२ मे, २०१९ व जा.क्र.५१९९३-९५, दिनांक २६ ऑगस्ट, २०१९.

२) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील पत्र क्र.राआआअ/आरसीएच-१/१३ व्या वित्त आयोग/४७८१२-८२५/१५, दिनांक १७ ऑक्टोंबर, २०१५.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.प्रशामा-२०१७/प्र.क्र.२३१/आरोग्य-७, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१७.

४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.प्रशामा-२०१७/प्र.क्र.४६६/आरोग्य-७, दिनांक ०९ नोव्हेंबर, २०१७.

प्रस्तावना :-

राज्यातील १३ व्या वित्त आयोगाकडून अर्भक मृत्यूदर कमी करण्यासाठी प्राप्त अनुदानातून मंजुर अनुदानाच्या विनियोगासाठी अतिजोखमीच्या अहेरी, धारणी, चिखलदरा, पेठ व धडगांव या पाच तालुक्यातील १०८ नंबरच्या ॲम्ब्युलन्सच्या अपग्रेडेशन अंतर्गत (बॅटरी ऑपरेटेड ट्रान्सपोर्ट वार्मर, पल्स ऑक्सीमीटर, सीपॅप व कांगारु बॅग इ.) उपकरणे व साहित्य खरेदीसाठी अंदाजित रक्कम रु.६.७९ लक्ष रकमेच्या खर्चास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

१३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार अर्भक मृत्यूदर कमी करण्यासाठी केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त झालेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबत मा.मुख्य सचिव यांच्या

अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय संनियत्रण समितीच्या बैठकीत सुधारित कृती आराखडा तयार केलेला असून त्यानूसार मंजुर करण्यात आलेल्या एकूण रु.२३१.४५ कोटी अनुदानाचा विनियोग करण्याबाबत दि.१६/०३/२०१५ च्या शासन निर्णयानूसार मान्यता देण्यात आलेली आहे. सदर निधीतून आदिवासी भागातील अर्भक मृत्यूदर कमी करण्यासाठी/ मृत्यू टाळण्यासाठी राज्यातील अतिजोखमीचे ५ तालुके अहेरी, धारणी, चिखलदरा, पेठ व धडगांव मधील १०८ नंबरच्या दहा ॲम्ब्युलन्स (१०८ नंबरच्या ॲम्ब्युलन्स) यांना Upgrade करण्यासाठी आवश्यक उपकरणे खरेदीस्तव अंदाजित रक्कम रु.१०.०० लक्ष रकमेच्या खरेदीस सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र.प्रशामा-२०१७/प्र.क्र.४६६/ आरोग्य-७, दि.०९/११/२०१७ नूसार प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. तथापि, सदर प्रकरणी आरोग्य संचालनालय, खरेदी कक्ष यांच्याकडून वर नमूद केलेल्या उपकरणांची खरेदी प्रक्रिया झालेली नसल्याने तसेच खरेदीसाठीच्या शासनाकडील प्रशासकीय मान्यतेस जवळपास दोन वर्षाचा कालावधी उलटून गेल्यामुळे नवीन शासकीय खरेदी धोरणानूसार सदर प्रकरणी नव्याने प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), राज्य कुटुंब कल्याण व माताबाल संगोपन कार्यालय, पुणे यांनी शासनास सादर केलेला आहे.

त्यानुषंगाने अतिरिक्त संचालक (आरोग्य सेवा), कुटुंब कल्याण, माताबाल संगोपन व शालेय आरोग्य, पुणे-१ यांनी प्रस्तावित केल्यानूसार राज्यातील अतिजोखमीच्या अहेरी, धारणी, चिखलदरा, पेठ व धडगांव या पाच तालुक्यातील १०८ नंबरच्या दहा ॲम्ब्युलन्सकरीता आवश्यक असलेल्या बॅटर ऑपरेटेड ट्रान्सपोर्ट वॉर्मर, पल्स ऑक्सीमीटर, सीपॅप व कन्झुमेबल्स बाबी (कांगारु बॅग) खरेदीसाठी खालील विवरणपत्रात नमूद केलेल्या बाबींच्या अंदाजित रक्कम रु.६.७९ लक्ष रकमेच्या उपकरणे खरेदीकरीता निविदा प्रक्रियेस पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**विवरणपत्र**

| अ.क्र. | उपकरणाचे नाव | अंदाजित दर (रुपयात) | संख्या | एकूण रक्कम (रुपयात) |
|---|---|---|---|---|
| १ | बॅटर ऑपरेटेड ट्रान्सपोर्ट वॉर्मर | ३०,०००/- | १० | ३,००,०००/- |
| २ | पल्स ऑक्सीमीटर | ७,०००/- | १० | ७०,०००/- |
| ३ | सीपॅप | ३०,०००/- | १० | ३,००,०००/- |
| ४ | कांगारु बॅग | ९००/- | १० | ९,०००/- |
| | | | **एकूण** | **६,७९,०००/-** |

**अटी :-**

१) सदर उपकरणे व सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू उपकरणे व सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक १ डिसेंबर, २०१६ अन्वये प्रसिध्द करण्यात आलेल्या शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारीत नियमपुस्तिका यामधील तरतूदीनुसार विहित खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

४) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे GEM Portal, इतर राज्यांचे दरकरार, National Medical Devices Authority (NDMA) यांच्याकडील उपलब्ध असलेल्या न्युनत्तम दर विचारात घेण्यात यावेत. तसेच हाफकिन संस्थेतील सदर बाबींची खरेदी केली जात असल्यास अथवा झालेली असल्यास निविदेत प्राप्त झालेले न्युनत्तम दर निविदेकरीता मागणी नोंदवितांना औषधी, औषधी साहित्य व उपकरणांच्या संदर्भात अंदाजित दर म्हणून नोंदविण्यात यावेत व खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

६) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

७) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च १३ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनूसार केंद्र शासनाकडून राज्य शासनास प्राप्त झालेल्या रक्कम रु.२३१.४५ कोटी इतक्या निधीतून भागविण्यात यावा.

८) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

९) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

१०) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ.क्र.४ नियम क्र.७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

उपरोक्त अनुक्रमांक १ ते १० येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकते प्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय व कार्यक्रम प्रमुख यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201911271233263717 असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Milind Raghunath Kulkarni

Digitally signed by Milind Raghunath Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, cn=Milind Raghunath Kulkarni
Date: 2019.12.07 12:54:54 +05'30'

**( मिलिंद कुळकर्णी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३) अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
४) सर्व सह संचालक (आरोग्य सेवा संचालनालया मार्फत)
५) सर्व सहसचिव/उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग.
६) उप संचालक, सर्व मंडळ कार्यालये.
७) सर्व जिल्हा शल्य चिकित्सक (FWB मार्फत)
८) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी (FWB मार्फत)
९) निवडनस्ती (आरोग्य-७)